नविन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना जमा झालेल्या अंशदानावर सन २०१६-१७ करीता व्याज दर

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनियो-२०१६/प्र.क्र.१००/सेवा-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीखः २५ जानेवारी, २०१७.

वाचा :

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि. ३१ ऑक्टोबर, २००५.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : अंनियो १०१०/प्र.क्र.६७/सेवा-४, दि. १४ डिसेंबर, २०१०.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : अंनियो २०१५/प्र.क्र.२८/सेवा-४, दि. २७ मार्च, २०१५.
४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : अंनियो २०१६/प्र.क्र.३०/सेवा-४, दि. २९ मार्च, २०१६.
५) वि.वि. शासन अधिसूचना क्र. भनिनि-२०१६/प्र.क्र.४४/सेवा-६,दि.१० जून,२०१६
६) वि.वि. शासन अधिसूचना क्र. भनिनि-२०१६/प्र.क्र.५०/सेवा-६, दि.०४ ऑगष्ट,२०१६
७) वि.वि. शासन अधिसूचना क्र. भनिनि-२०१६/प्र.क्र.६५/सेवा-६,दि.१३ ऑक्टोबर,२०१६ व दि.२६ ऑक्टोबर,२०१६

**प्रस्तावना:**

संदर्भाधिन क्रमांक १ येथील शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५ अन्वये नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत स्तर-१ मध्ये प्रत्येक शासकीय कर्मचाऱ्याचे मूळ वेतन अधिक महागाई वेतन (असल्यास) अधिक महागाई भत्ता या रकमेच्या १०% इतके मासिक अंशदान व राज्य शासनाकडून समतुल्य अंशदान जमा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : अंनियो १०१०/प्र.क्र.६७/सेवा-४, दि. १४ डिसेंबर, २०१० अन्वये सहाव्या वेतन आयोगाच्या थकबाकीची रक्कम नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत स्तर-२ मध्ये जमा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत स्तर-१ व स्तर-२ मध्ये सन २०१६-१७ मध्ये जमा झालेल्या रकमांवर व्याज देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत स्तर-१ मध्ये शासकीय कर्मचाऱ्यांकडून वसुल केलेल्या तसेच राज्य शासनाच्या समतुल्य अंशदानापोटी जमा झालेल्या एकत्रित रकमेवर शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक १०/०६/२०१६ अन्वये दिनांक ०१ एप्रिल, २०१६ ते ३० जून २०१६ या कालावधीकरीता व्याजदर दर शेकडा ८.१ टक्के, शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक ०४/०८/२०१६ अन्वये दिनांक ०१ जुलै, २०१६ ते ३० सप्टेंबर, २०१६ या कालावधीकरीता व्याजदर दर शेकडा ८.१ टक्के, तसेच शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक १३/१०/२०१६ अन्वये दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ ते ३१ डिसेंबर, २०१६ या कालावधीकरीता व्याजदर दर शेकडा ८ टक्के प्रमाणे सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीकरीता ठरविण्यात आलेल्या व्याज दराने उपरोक्त दरानुसार व्याज देण्यात यावे. व्याज जमा करण्यासंदर्भातील कार्यवाही राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडून करण्यात येईल.

२. सहाव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत स्तर-२ मध्ये उपरोक्त कालावधीत थकबाकीची रक्कम जमा झालेली असल्यास या जमा झालेल्या थकबाकीच्या रकमेवर देखील उपरोक्त दरानुसार व्याज देण्यात यावे. व्याज जमा करण्या संदर्भातील कार्यवाही राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडून करण्यात येईल.

३. वरील कार्यपध्दती जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय प्राथमिक व माध्यमिक शाळा, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालये तसेच कृषि विद्यापीठे इत्यांदीमधील कर्मचाऱ्यांना योग्य त्या फेरफारांसह लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२५१५०२१८१५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2017.01.25 15:01:22 +05'30'

**( अनुदीप दिघे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१००० प्रती),
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) राज्यपालांचे सचिव,
१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१६) उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१८)*विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
२०) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
२१) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२२) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२३) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२४) *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
२५) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२६) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
२७) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
२८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२९) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.
३०) ग्रं थपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
३१) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०
३२) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.
३३) मंत्रालयातील सर्व विभाग,
३४) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
३५) सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
३६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
३७) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
३८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
३९) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
४०) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
४१) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
४२) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
४३) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
४४) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
४५) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
४६) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
४७) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
४८) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),

४९) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),

५०) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),

५१) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर (५ प्रती),

५२) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)

५३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)

५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई ४ ( ५ प्रती)

५५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५प्रती )

५६) इंडियन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती )

५७) नॅशनलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )

५८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)

५९) वित्त विभागातील सर्व कार्यासने,

६०) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

***पत्राद्वारे.**